**मौजे बिरसी, जि.गोंदिया येथील सर्व्हे नं.२९३ मधील १.४९ हे.आर जमीनीसाठी अकृष दराने उर्वरीत रु.१२,०३,२००/- एवढ्या रकमेचा भरणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. ए.आय.आय.-२०१२/प्र.क्र.३५३/ २८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दि. २० ऑक्टोबर, २०२०.

**वाचा :** १. उपविभागीय अधिकारी,गोंदिया यांचे दि.०९.०३.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :**

मौजे बिरसी, जि.गोंदिया येथील सर्व्हे नं.२९३ मधील १.४९ हे.आर जमीन सन २००७ मध्ये भारतीय विमानपत्तन प्राधिकरण यांना विमानतळाच्या धावपट्टीसाठी हस्तांतरीत करण्यात आली आहे. सदर जमिनीसाठी कृषक दरानुसार रु.४,०२,३००/- एवढी रक्कम भारतीय विमानपत्तन प्राधिकरणाने जिल्हाधिकारी, गोंदिया यांना सन २००७ मध्ये अदा केली आहे.

२. सदर १.४९ हे.आर जमीन अकृषक असल्याचे नमूद करुन त्यासाठी रु.१६,०५,५००/- एवढ्या रकमेची वसुली करण्यासंदर्भात उपविभागीय अधिकारी, गोंदिया यांनी विमानतळ संचालक, गोंदिया यांना कळविले असून सदर प्रकरणी उर्वरीत रु.१२,०३,२००/- एवढ्या रकमेचा फ़रक भरणा करणे आवश्यक आहे. या अनुषंगाने सदर रक्कम जिल्हाधिकारी गोंदिया यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचराधीन होती.

**शासन निर्णय :**

मौजे बिरसी, जि.गोंदिया येथील सर्व्हे नं.२९३ मधील १.४९ हे.आर जमीनीसाठी रकमेचा फ़रक भरणा करणेबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

(१) मौजे बिरसी, जि.गोंदिया येथील सर्व्हे नं.२९३ मधील १.४९ हे.आर जमीनीचा उर्वरीत रकमेचा फ़रक भरणा करण्यासाठी **रु.१२,०३,२००/-** निधी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष ३०५३ ०१६४ खाली उपलब्ध तरतुदीतून वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. तरी, सदर रक्कम रु.१२,०३,२००/- (अक्षरी रक्कम रु.बारा लक्ष तीन हजार दोनशे फक्त) जिल्हाधिकारी, गोंदिया कार्यालयास उपलब्ध करुन देण्यासाठी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम उपलब्ध झाल्यानंतर जिल्हाधिकारी, गोंदिया कार्यालय विहीत कार्यपध्दतीने सदर प्रकरणी रकमेचा फ़रक भरणा करण्याची कार्यवाही करील.

३. राज्यातील विमानतळांच्या विकासासाठी कार्यक्रम लेखाशीर्ष ३०५३ ०१६४, ३१- सहायक अनुदाने खाली निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सदर लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक

वर्षासाठी रु.७८.०० कोटी तरतूद अर्थसंकल्पित करुन देण्यात आलेली आहे. या निधीपैकी १० टक्के मर्यादेत म्हणजे रु.७.८० कोटी निधी आतापर्यंत या विभागास उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यापैकी, रु.७.५० कोटी इतका निधी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस वितरीत करण्यात आला आहे.

४. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१६४) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

५. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो विहीत मुदतीत खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२९७/२०२०/व्यय-४, दि.२४.०९.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२०१०२०१६५४०७२१०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sanjeev R
Keluskar

Digitally signed by Sanjeev R Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, serialNumber=78be615e7dd51ebb89a43e2d8f1b14979bf8f5ae2c63e3a7fe41c5716996cd4b, cn=Sanjeev R Keluskar
Date: 2020.10.22 16:01:12 +05'30'

**(संजीव केळुसकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१. प्रधान सचिव, (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
२. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या, मुंबई
३. संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
४. विभागीय कार्यकारी अधिकारी, भारतीय विमानपत्तन प्राधिकरण (प.क्षे.), मुंबई
५. महालेखापाल, ( लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. जिल्हाधिकारी कार्यालय, गोंदिया.

७. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (कार्या.२५), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती.